**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : अनुदा-२०१४/भारित/(प्र.क्र.११४/११)/का.२३
विधी व न्याय विभाग
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ७ जून ,२०११..

विषय : २०११-१२ या वित्तीय वर्षातील प्रथम नऊमाहीकरिता
<u>( दि. १ एप्रिल ते ३१ डिसेंबर,२०११) अनुदानाचे वाटप.</u>
**"मागणी क्रमांक जे-१, २०१४ न्यायदान (भारित)"**

संदर्भ : १) शासन ज्ञापन, विधी व न्याय विभाग क्रमांक: लेखानु-२०१४/ भारित/(प्र.क्र.८८/११)/का.२३, दि. १९ एप्रिल, २०११..
२) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक : अंदाज- २०.११/प्रक्र.९३/ २०११./अर्थसंकल्प-३, दिनांक ६ मे, २०११.
३) वित्त विभाग पत्र क्र. एस्टीमेट-२०११/प्र.क्र.३/बीयुडी-३, दि. २.६.२०११

**<u>ज्ञापन</u>** :

२०११-१२ या वित्तीय वर्षाच्या कालावधीसाठी अर्थसंकल्पीय तरतूद वाटप करण्यासाठी "महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०११." ( महाराष्ट्र विनियमन (लेखानुदान)) अधिनियम, २०११ च्या अनुसूचीच्या स्तंभ चार मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह ) यास विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे आणि ते २०११ चा अधिनियम क्रमांक १७ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-८ दिनांक २१ एप्रिल, २०११ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. यास्तव मागणी क्रमांक जे-१, २०१४- न्यायदान (भारित), या लेखाशिर्षाखालील सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता उद्दिष्टनिहाय खर्च भागविण्यासाठी रुपये १,३५,५४,९४,०००/- इतके अनुदान मंजूर केले आहे. वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार त्यापैकी ७५ % च्या मर्यादेत दिनांक १ एप्रिल ते ३१ डिसेंबर, २०११ या कालावधीसाठी सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे रक्कम रुपये १,०१,६५,४६,०००/- (एकशे एक कोटी पासष्ट लक्ष सेहेचाळीस हजार फक्त) (भारित) इतक्या तरतूदीचे वाटप करण्यात येत आहे. यामध्ये संदर्भ क्रमांक १ येथील शासन ज्ञापन दिनांक १९ एप्रिल, २०११. अन्वये वितरीत केलेल्या लेखानुदानाचाही समावेश करण्यात आला आहे.

३. अर्थसंकल्पाद्वारे उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून मासिक निधी विवरणपत्रानुसार संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीमध्ये दर्शविल्याप्रमाणे खर्चासाठी रक्कम उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

४. प्रत्येक मुख्यलेखाशिर्षाखालील खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे दरमहा करण्यात यावा. तसेच सर्व नियंत्रक अधिका-यांनी उपलेखाशिर्षनिहाय व उद्दिष्टनिहाय मासिक खर्चाचे नियोजन करुन संगणकीय अर्थसंकल्प प्रणालीद्वारे तरतूदींचे वाटप करण्यात यावे.

५. सर्व संबंधित नियंत्रक अधिका-यांनी आपल्या कार्यालयाच्या नियंत्रणाखाली असलेल्या तपशीलवार लेखाशिर्षामध्ये निर्देशित केलेल्या तरतूदी विचारात घेऊन उपलब्ध झालेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची कृपया काटेकारेपणे दक्षता घेण्यात यावी. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, नियंत्रक अधिका-यांकडून नवीन वित्तीय वर्षाचे अनुदान सुपूर्द झाल्याबरोबर चालू वित्तीय वर्षाच्या सुरुवातीच्या काही महिन्यामध्येच खर्च करुन निरनिराळ्या कारणासाठी दरवर्षी अतिरिक्त अनुदानाची मागणी करण्यात येते. यास्तव सर्व नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी आपल्या कार्यालयाच्या तपशीलवार लेखाशिर्षामध्ये निर्देशित केलेल्या अनुदानाचा परामर्श घेऊन खर्चाचे नियोजन करुन उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची काटेकोरपण दक्षता घेण्यात यावी.

६. सर्व नियंत्रक अधिका-यांनी आपल्या कार्यालयाच्या संबंधित तपशीलवार / उद्दिष्टनिहाय खर्च केलेल्या रकमा कोषागारातील हिशेबाच्या नोंदवहीत त्या त्या तपशीलवार लेखाशिर्षाप्रमाणे घेतल्या जातील याकडे विशेष लक्ष द्यावे.

७. अर्थसंकल्पिय अनुदानाचा सुयोग्य वापर होण्यासाठी खाली दिलेल्या सूचनांचे कृपया काटेकोरपण पालन करावे.

अ) सदर अनुदानातून करण्यात येणारा खर्च हा मान्य योजनांसाठीच करण्यात यावा व तो खर्च मंजूर तरतूदीच्या मर्यादेत असावा. नवीन प्रयोजनासाठी / नवीन बाबींसाठी मंजूर तरतूदीतून खर्च करण्यात येऊ नये.

ब) "कार्यालयीन खर्च" या खाली येणा-या पुस्तके, फर्निचर, रंगीत रुमाल, जंतुनाशक औषधे इत्यादिंवरील खर्च वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ अनुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारापेक्षा जास्त असेल तर त्यास शासनाची मंजूरी घेण्यात यावी.

क) मुख्य लेखाशिर्षाखालील उद्दिष्टनिहाय झालेला खर्च हा त्या त्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा. तसेच कोणत्याही परिस्थितीमध्ये शासनाच्या पूर्वमंजुरीशिवाय त्या त्या तपशीलवार लेखाशिर्षाचा खर्च हा विवरणपत्रामध्ये दर्शविलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. आहरण व संवितरण अधिकारी यांनी मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करणे, शासनाची अनुमती न घेता परस्पर खर्च करणे अशा वित्तीय अनियमिततेबद्दल संबंधित अधिका-यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

ड) प्रत्येक कार्यालयाने उद्दिष्टनिहाय केलेला दर महिन्याचा प्रत्यक्ष खर्च हा महालेखापाल यांच्या लेख्यामध्ये दर्शविण्यात आलेल्या खर्चाशी तंतोतंत जुळण्यासाठी दरमहा मासिक खर्चमेळाचे काम करण्यात यावे व पडताळणी केलेल्या खर्चाचे मासिक विवरणपत्र प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागाच्या कार्यासन-२४ कडे परस्पर पाठविण्यात यावे.

इ) सर्व जिल्हा/तालुका कोषागारात पाठविण्यात येणा-या प्रत्येक देयकावर सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केलेल्या त्या त्या लेखाशिर्षानुसार संकेतांक क्रमांक अचूक नमूद करण्यात यावा.

फ) याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.२, येथे नमूद केलेल्या वित्त विभागाच्या दि.६मे,२०११ व संदर्भ ३ वरील दि. ६.२.२०११ च्या परिपत्रकाची व पत्राची प्रत सोबत उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. सदर परिपत्रकाचे व पत्राचे अवलोकन करुन त्यात दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सोबत : वरीलप्रमाणे

( वि. श्री. पाटील )
कार्यासन अधिकारी

प्रत, माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा) एक, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) दोन, महाराष्ट्र, नागपूर
प्रबंधक उच्च न्यायालय, (मूळ/ अपील शाखा), मुंबई
मुख्य अनुवादक, उच्च न्यायालय, (मूळ / अपील शाखा), मुंबई
लेखा अन्वेषण आयुक्त, उच्च न्यायालय, मुंबई.
परिव्यय निर्धारक, उच्च न्यायालय, मुंबई.
नादारी प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
न्यायालय धारक व परिसमापक, उच्च न्यायालय, मुंबई
लेखा अधिकारी, उच्च न्यायालय, मुंबई
मुंबईचे शेरीफ, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (दोन प्रती)
वित्त विभाग (अर्थसंकल्प-११, व्यय-६, अर्थोपाय )
विधी व न्याय विभाग, कार्यासन क्र. ४,९ व २४, ७ संगणकावर सदर ज्ञापन अपलोडकरण्याच्या विनंतीसह,
निवड नस्ती.

शासन ज्ञापन विधी व न्याय विभाग क्रमांक- लेखानु २०१४ /(भारित)/(प्र.क्र.११४/११)/का.२३, दिनांक : ७ जून,२०११ चे सहपत्र

विवरण पत्र

२०१४-न्यायदान (भारित) या प्रधानशीर्षाचे सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता दिनांक १ दिनांक १ एप्रिल,२०११ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०११ या कालावधीसाठी लेखानुदानाचे वाटप (रु हजारात)

| अ.क्र. | लेखाशीर्ष/ उपशीर्ष | नियंत्रक अधिकारी क्र. | ०१ वेतन | ०२ मजूरी | ०३ अतिकालिक भत्ता | ६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ११ देशांतर्गत प्रवास खर्च | १२ परदेश प्रवास | १३ कार्यालयीन खर्च | १४ भाडे, पट्टी व कर | १६ प्रकाशने | १७ संगणक खर्च | २० इतर प्रशासकीय खर्च | २७ लहान बांधकामे | २८ व्यावसायिक सेवा | ३१ सहायक अनुदाने | ५२ यंत्र सामुग्री व साधनसामग्री | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | CON | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ |
| १ | १०२ (०१) (०१) न्यायाधीश (२०१४००६५) | J0001 | ११२५१३ | ० | ० | ६९०० | ५२५० | १ | १६५३७ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | १४१२०१ |
| २ | १०२ (०२) (०१) प्रबंधक, मूळ शाखा (२०१४००७४) | J0001 | १०८५३५ | ० | ८१ | ८२५० | ५६ | ० | ८२६८ | ३७५ | ० | १२०० | २२५ | ० | ० | ० | ० | १२६९७० |
| ३ | १०२ (०२) (०२) अनुवादक (२०१४००८३) | J0001 | १२४२६ | ० | ० | १० | ० | ० | २९ | ० | ० | ६ | ० | ० | ० | ० | ० | १२४७१ |
| ४ | १०२ (०४)(०१) लेखा अन्वेषण आयुक्त (२०१४०११८) | J0001 | ३९७५ | ० | ० | ९ | ० | ० | ४० | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | ४०२५ |
| ५ | १०२ (०५)(०१) परिव्यय निर्धारक (२०१४०१२७) | J0001 | २६४१ | ० | ० | ९ | ० | ० | ३७ | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | २६९६ |
| ६ | १०२ (०६)(०१) नादारी प्रबंधक(२०१४०१३६) | J0001 | ३५६१ | ० | ० | ५ | ० | ० | ४५ | ० | ० | ६ | ० | ० | ० | ० | ० | ३६१७ |
| ७ | १०२ (०७) (०१) न्यायालय धारक व परिसमापक (२०१४०१४५) | J0001 | २३२५१ | ० | ० | ११२ | ० | ० | ११२ | १२९ | ० | ३ | ० | ० | ० | ० | ० | २३६०७ |
| ८ | १०२ (०८)(०१) लेखा अधिकारी (२०१४०१५४) | J0001 | २७३१ | ० | ० | १० | ० | ० | २७ | ० | ० | ३ | ० | ० | ० | ० | ० | २७७१ |
| | एकूण प्रबंधक उच्च न्यायालय | | २६९६२१ | ० | ८१ | १५३०५ | ५३०६ | १ | २५०९५ | ५०४ | ० | १२२० | २२५ | ० | ० | ० | ० | ३१७३६६ |
| १० | १०२ (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४००१२) | J0002 | ५४१०१४ | १५७५ | १६३ | ८६२५ | १४७० | ० | २२८३४ | १८७५ | ५६२५ | ३००० | ० | ० | ० | ० | ० | ५९४१८१ |
| ११ | १०२ (०३) (०२) अनुवादक (२०१४०१०१) | J0002 | ३९४३ | ० | ० | १ | ० | ० | १० | ० | ० | ३ | ० | ० | ० | ० | ० | ३९५७ |
| १२ | १०२ (०१) (०१) न्यायालयांची दर्जा वाढ व प्रलंबित प्रकरणे त्वरित निकालात काढण्यासाठी विशेष अनुदान. (२०१४०३८८) | J0002 | ८४५०३ | ० | १ | ११२५ | ७ | ० | ८५२९ | १ | ० | १ | ० | ५५१ | १ | ० | २१७ | ९४९३६ |
| | एकूण महाप्रबंधक उच्च न्यायालय | | ६३७४६० | १५७५ | १६४ | ९७५१ | १४७७ | ० | ३१३७३ | १८७६ | ५६२५ | ३००४ | ० | ५५१ | १ | ० | २१७ | ६९३०७४ |
| ९ | ११३ (००) (०१) शेरीफ (२०१४०२७२) | J0043 | ५९८७ | ० | ० | २२ | ० | ० | ७५ | ० | ० | ७ | १५ | ० | ० | ० | ० | ६१०६ |
| | एकूण शेरीफ | | ५९८७ | ० | ० | २२ | ० | ० | ७५ | ० | ० | ७ | १५ | ० | ० | ० | ० | ६१०६ |
| | एकूण भारीत | | ९१३०७६ | १५७५ | २४५ | २५०७८ | ६७८३ | १ | ५६५४३ | २३८० | ५६२५ | ४२३१ | २४० | ५५१ | १ | ० | २१७ | १०१६५४६ |

वि.श्री. पाटील
कक्ष अधिकारी

VOTEONACCDIST1112110411.xls

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्र.अंदाज-२०.११/प्र.क्र.१३/२०११/अर्थसंकल्प-३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६ मे, २०११

पहा : १) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक-असंक १००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर,२००१.

## परिपत्रक

सर्व मंत्रालयीन विभागांना कळविण्यात येते की, "महाराष्ट्र विनियोजन विधेयक,२०११" (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम,२०११ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिलेली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे, आणि ते २०११ चा अधिनियम क्रमांक १७ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग ८ दि.२१ एप्रिल, २०११ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

२. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-असंक १००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर,२००१ अन्वये विहीत केल्यानुसार नवीन पदे निर्माण करण्याच्या प्रस्तावास वित्त विभागाची व योजनांतर्गत योजनेच्या बाबतीत नियोजन व वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाल्यावर असे प्रस्ताव १० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयाद्वारे स्थापन करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीपुढे सादर करुन, समितीच्या मान्यतेनंतर आवश्यकतेनुसार कांही प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या पुर्वसंमतीसाठी मंत्रिमंडळापुढे ठेवण्यात यावेत. अशाप्रकारे उच्चस्तरीय सचिव समितीची व आवश्यक तिथे मंत्रिमडळाची मान्यता असल्याशिवाय कोणतेही पद निर्माण करण्याचे आदेश काढू नयेत, असे मंत्रालयीन विभागांना कळविण्यात आले आहे. सन २०११-२०१२ च्या अर्थसंकल्पामध्ये कांही नवीन बाबी अशा आहेत की, त्यामध्ये पदे निर्मितीचा खर्च अंतर्भूत आहे. ज्या पदांच्या निर्मितीपूर्वी प्रस्तावास मंत्रिमंडळाच्या मान्यतेची आवश्यकता आहे, अशी पदे निर्माण करण्यासाठी उच्चस्तरीय सचिव समितीची व आवश्यक तिथे मंत्रिमंडळाची मान्यता घेतली नसल्यास त्यासाठी नवीन बाबीद्वारे केलेली तरतूद सन २०११-२०१२ या वर्षाच्या अनुदानामधून वगळण्यात यावी. अशा तरतुदी वगळून राहिलेल्या रकमा परि.४ मध्ये निर्देशित केल्याप्रमाणे मंत्रालयीन विभागांना त्यांच्या दुय्यम कार्यालयामध्ये वाटून देता येतील. नवीन पदांसाठी केलेली तरतूद नंतर मंत्रिमंडळाची मान्यता घेतल्यास दुय्यम कार्यालयांना वाटता येईल. तथापि असे प्रस्ताव मंत्रिमंडळाने अमान्य केल्यास याबाबतची तरतूद प्रत्यार्पित करुन गौणशीर्ष "राखीव" कडे घेण्यात यावी.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त परिच्छेदानुसार नवीन बाबींमध्ये समाविष्ट केलेल्या ज्या पदांच्या निर्मितीसाठी मंत्रिमंडळाच्या मान्यतेची आवश्यकता आहे ती पदे निर्माण करण्याचे आदेश त्यांनी मंत्रिमंडळाची मान्यता मिळाल्यानंतरच काढावेत.

४. वित्तिय वर्ष सन २०११-२०१२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०११-२०१२ च्या प्रथम नऊमाहीकरिता आवश्यक असणारा योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण

ROTA-JH 748 (500-5-2011)

वार्षिक तरतूदीच्या ७५ टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरित केला जाईल.

मासिक विवरणपत्रानुसारचा निधी एप्रिल ते डिसेंबरच्या कालावधीमध्ये पुढे/मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात येत आहे.

५. तथापि, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी खालील बाबींसाठी प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाच्या व्यय शाखा व अर्थसंकल्प शाखा यांची मान्यता घेणे आवश्यक आहे. तदनंतर प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाच्या व्यय शाखेच्या मान्यतेचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक नमूद करुन शासन निर्णय निर्गमित करावा.

| अ.क्र. | खर्चाचे स्वरुप | |
|---|---|---|
| १ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत नवीन योजनांसाठी करावयाचा खर्च | नियोजन व वित्त विभागाची सहमती आवश्यक |
| २ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनेतर नवीन योजनांसाठी करावयाचा खर्च | वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ३ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च | योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत असल्यास नियोजन व वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ४ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनेतर जुन्या योजनांचा खर्च | योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत असल्यास वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ५ | अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या केंद्र पुरस्कृत व बाह्य सहाय्यित योजनांचा खर्च | केंद्र पुरस्कृत योजनेसंदर्भात केंद्र शासनाकडून प्रत्यक्षात निधी प्राप्त झाल्याशिवाय सदर निधी आहरित करण्यात येऊ नये. त्याचप्रमाणे ज्या योजनेत केंद्र शासनाच्या निधीसोबत राज्य शासनाचा यथाप्रमाण निधी अर्थसंकल्पीत झाला असेल तो निधी यथाप्रमाणे राज्य शासनाच्या हिश्श्याच्या मर्यादेतच आहरित करावा. यासाठी वित्त विभागाचे व्यय व अर्थोपाय शाखेची सहमती आवश्यक.<br><br>असे असले तरी गेल्या २-३ वर्षात ज्या केंद्र योजनेचा हिस्सा विहित कालावधीत प्राप्त झाला अशा योजनेचा राज्य हिस्सा केंद्राचा निधी प्राप्त होण्यापूर्वीच वितरीत करण्याचा निर्णय वित्त विभागाच्यास्तरावर प्रकरण निहाय घेण्यात येईल. |
| ६ | शासनाच्या धोरणात्मक निर्णयानुसार राबविण्यात येणा-या विशेष स्वरुपाच्या योजना (उदा.कर्जमाफी योजना, नुकसान भरपाईसाठी अर्थसहाय्य) | वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| ७ | तेराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार केलेल्या सर्व तरतूदी. | वित्त विभागाची सहमती आवश्यक. |

| | | |
|---|---|---|
| ८ | योजनांतर्गत व योजनेतर तरतुदींपैकी खालील तपशीलवार शिर्षाचा खर्च | |
| | २७) लहान बांधकामे (फक्त सार्वजनिक बांधकाम विभाग व जलसंपदा विभाग) | |
| | ३१) वेतनेत्तर सहायक अनुदाने | योजनांतर्गत बाबींसाठी नियोजन व वित्त विभागाची सहमती आवश्यक. योजनेतर बाबींसाठी वित्त विभागाची सहमती आवश्यक. |
| | ३२) अंशदाने | |
| | ३३) अर्थसहाय्य | |
| | ३५) भांडवली खर्चासाठी सहाय्यक अनुदाने | |
| | ३६) वेतनासाठी सहाय्यक अनुदाने | |
| | ५३) मोठी बांधकामे | |
| | ५४) गुंतवणूका | |
| | ५५) कर्जे व अग्रिम | |
| | ५६) कर्जाची परतफेड | |

६. प्रशासकीय विभागांनी निधीबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे पालन करावे. त्याचप्रमाणे खाली दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७ विविध शासकीय/प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वीच्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागाने प्राप्त करावीत. पूर्वी दिलेल्या अनुदानाचा विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरित करण्यात येऊ नये.

८ स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदाने वितरित करण्यापूर्वी सदर संस्थांकडून राज्य शासनास येणे असणा-या रकमांचा आढावा घेण्यात यावा , व त्या वसूल करुनच उर्वरित अनुदान वितरित करण्यात यावे.

९. वैयक्तिक लाभार्थींच्या योजनेची देयके आहरित करताना लाभाधारकांची यादी निश्चित करून योग्य त्या तपशिलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरित करण्यात येऊ नये.

१०. शिष्यवृत्ती, शिक्षणशुल्काची प्रतिपूर्ती, वैयक्तिक लाभार्थी यांची प्रदाने, इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीम (ECS) नेच अदा करण्यात यावीत.

११. बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय मान्यता/तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता प्राप्त करून घेतल्याशिवाय विभागाने खर्च करु नये. त्याचप्रमाणे हा निधी ठेव बांधकामाचे स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करु नये.

१२. साहित्य खरेदीची प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदीची देयके कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. खरेदी विषयक धनादेश संबंधित पुरवठादाराच्याच नांवाने अदा करण्यात यावा. दरकरार/निविदे मध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रिम अदा करण्यात येऊ नये.

१३. विविध कारणांमुळे अखर्चित राहिलेला निधी विभागांनी त्यांच्या अधिनस्त महामंडळाकडे हस्तांतरित करून तांत्रिकदृष्टया खर्च झाल्याचे दाखवू नये. ही एकप्रकारे वित्तीय अनियमिततेची गंभीर बाब असेल.

१४. विभागाद्वारे करण्यात येणारा संगणकीकरण संदर्भातील खर्च शासनाचे दरपत्रकानुसारच करण्यात यावा. आवश्यक तेथे माहिती व तंत्रज्ञान विभागाची मान्यता प्राप्त करुन घेण्यात यावी.

१५. थकित देयकांच्या प्रदानासाठी खर्च करण्यात येणाऱ्या प्रकरणी खरेदी केलेले साहित्य प्रत्यक्ष प्राप्त झाल्याचे व त्याचे लेखे सुयोग्यरित्या ठेवल्याची खात्री पटल्याशिवाय तो निधी आहरित करण्यात येऊ नये.

१६. वेतनविषयक खर्च वगळता उर्वरित बाबींचा खर्च आर्थिक वर्षाचे कालावधीत समप्रमाणात केला जात नाही असे निदर्शनास येते. निधी उपलब्ध असूनही प्रक्रियेअभावी तो खर्च करता येत नाही. परिणामी, बहुतांश तरतूदी वर्षभर अखर्चित राहतात व आर्थिक वर्षाचे अखेरचे कालावधीत पुरेशा तयारीशिवाय खर्च केल्या जातात. २५% पेक्षा जास्त अर्थसंकल्पित तरतूद आर्थिक वर्षाच्या शेवटच्या महिन्यात खर्च झालेली दिसते. या सर्व बाबींमुळे वित्तीय शिस्तीचे पालन केले जात नाही. विकास योजनांची प्रगती राखली जात नाही. सन २०११-२०१२ या वर्षासाठी विभागांच्या खर्चाचे प्रमाण योग्यरित्या नियोजित करण्यात यावे.

१७. या परिपत्रकातील मार्गदर्शनानुसार विभागाने संपूर्ण ७५% निधी खर्च केल्यावरच पुढील तिमाहीकरिता निधी प्राप्त करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करावा.

१८. डिसेंबर अखेर खर्चाचे प्रमाण ६५% पेक्षा कमी असल्यास याप्रमाणात सुधारित अंदाजात कपात करण्यात येईल. सुधारित अंदाज २०११-२०१२ मंजूर करतांना ते प्रत्यक्ष खर्चाचे प्रमाणातच मंजूर केले जातील, याची विभागाने नोंद घ्यावी.

१९. निधी वितरीत करताना मासिक निधी विवरणपत्रात (Cash Flow Statement) ज्या दरमहा खर्च रकमा दर्शविल्या आहेत त्याच्याशी सुसंगत असाव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु.प्र.कानडे)
सहसचिव, वित्त विभाग.

प्रति,

सर्व सह/उप सचिव अर्थसंकल्प शाखा, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र (VLC Section), मुंबई ( २५ प्रतीं ),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-दोन,महाराष्ट (VLC Section), नागपूर ( ५ प्रती ),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-एक,महाराष्ट्र, मुंबई, (१५ प्रती ),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-दोन, महाराष्ट्र, नागपूर ( ५ प्रती ),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ( ४० प्रती ),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई ( ५ प्रती ),
कार्यासन प्रशासन-४,वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
वित्त विभागातील सर्व सहसचिव, उप सचिव, व अवर सचिव,
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, अर्थसंकल्प-३.

—०X०—

## GOVERNMENT OF MAHARASHTRA

No. Estimate/-2011/CR-93/Bud-3
FINANCE DEPARTMENT
Mantralaya, Mumbai-400032.

Date : 2nd June, 2011.

To

The Addl. Chief Secretaries/Prin. Secretaries/
Secretaries of all Mantralaya Departments,
Government of Maharashtra,
Mantralaya, Mumbai-400 032.

**Sub : Budget Estimates 2011-12 – Release of funds on BDS.**

Sir / Madam,

Based on the feedback and suggestions received from various Departments, Finance Department has simplified the release of funds and expenditure mechanism in the Financial Year 2011-12.

Now Departments can fill cash flow upto 75% of Budget Estimates 2011-12 for expenditure upto December 2011. No approval of Finance Department is required for these Cash flows. The unspent balance of one month can be carried over to next month/quarter. No approval of Finance Department is required for change in Cash flow.




While drawing the funds from the treasuries & incurring the expenditure, Departments are requested to please follow the laid down guidelines and financial delegation available to Departments in Part I & Part II of Financial Delegation Rules 1978. Proposals would need to be sent to Planning / Finance Department for expenditure approval if delegation is not available to the Departments.

P.4 | Desk 13, 23
circulate to all desk officers
2/6/2011



In certain cases as listed in para 5 of Circular, dated 6th May, 2011, expenditure approval would be necessary from Finance Department/Planning Department as the case may be. In certain object heads, where expenditure approval is required of Finance Department, BDS slips generated out of those specific object heads would carry a line that UOR of concurrence of Finance Department is required, without which PAO/Treasury Officers will not accept the bills. Separate instructions have been issued to PAOs/Treasury Officers not to clear the bills without required approval of Planning/Finance Department for items listed in para 5 of Circular, dated 6th May, 2011.

While tremendous freedom has been given to the Departments to incur the expenditure, it is expected that the Departments would take care not to bunch the expenditure and funds would be used to meet out the expenditure over the complete year. It would also avoid liquidity problems for the State since the State gets its revenue proportionately over the year.

If still some issue is unresolved or some problem is being experienced by your Department, then the concerned Deputy Secretary looking after the Budget or any other designated Deputy Secretary may be asked to contact me on 4th or 6th of June, 2011 between 11am to 2 pm and 4 to 5 pm with details.

Yours faithfully,

( Dr. Pradeep Vyas )
Secretary to Government